**संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test)**
**उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
**माहिती तंत्रज्ञान संचालनालय**
**शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती ०४/१४/३९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ८ जुलै, २००४

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-१०००/प्र.क्र.१४३/३९, दि. १०.७.२०००
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९, दि. २०.७.२००२
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मातंसं/प्र.क्र.०३/६५/३९, दि. १७.५.२००३
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मातंसं /नस्ती ०४/१४/३९, दि.१२ फेब्रुवारी २००४
५) शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती ०४/२२४ /३९,दिनांक : २६ मे, २००४

## प्रस्तावना :-

शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याबाबतच्या धोरणात्मक निर्णयास अनुसरुन शासकीय कामकाजात संगणकाचा परिणामकारकरित्या वापर होण्यासाठी प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी उपलब्ध होण्यासाठी संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम देण्याचाही निर्णय घेतला होता परंतु शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-१०००/प्र.क्र.१४३/३९, दि. १०.७.२००० नुसार ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी प्रोत्साहनात्मक रक्कम व संगणक प्रशिक्षण खर्च घेतलेला आहे अथवा अशा रकमेची मागणी केलेली आहे त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळामार्फत घेतली जाणारी चाचणी परीक्षा Confirmatary Test), उत्तीर्ण होणे आवश्यक करण्यात आले होते. तथापि शासन निर्णय क्र. मातंसं/नस्ती०४/२२४/३९, दि. २६ मे, २००४ नुसार आता अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांनी D.O.E.A.C.C. सोसायटीच्या C.C.C. किंवा "O" किंवा "A" किंवा "B" किंवा "C" स्तर या पैकी कोणतीही एक परीक्षा, MS-CIT परीक्षा, किंवा चाचणी परीक्षा (Confirmatory Test) या तीन पर्यायी संगणक अर्हता परिक्षा म्हणून निश्चित करण्यात आल्यामुळे, या परीक्षांपैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक राहील.

२. दि. १२ फेब्रुवारी, २००४ च्या शासन निर्णयान्वये शासकीय सेवेतील गट **अ**, गट **ब** व गट **क** मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे प्रमाणपत्र सादर करण्यासाठी दि.२०.७.२००४ पर्यंत मुदत देण्यात आलेली होती. परंतु शासनाकडे उपलब्ध असलेली संगणक संख्या व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांची संख्या विचारात घेता राज्यातील सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेस पुरेसा अवधि देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच संदर्भ क्र. ५ नुसार संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण करुन शासनास प्रमाणपत्र सादर करावयाच्या अवधीस एक वर्षासाठी म्हणजेच दि. २०.७.२००५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. या अनुषंगाने संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## *शासन निर्णय :--*

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सध्या शासकीय सेवेत असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र प्राप्त करुन शासनास प्रमाणपत्र सादर करावयाचा दिनांक शासन निर्णय क्रमांक : मातंसं/फाईल०४/१४/३९, दि. १२ फेब्रुवारी, २००४ अन्वये २०.७.२००४ असा पूर्वी निश्चित करण्यात आला होता. तथापि या शासन निर्णयाव्दारे शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र सादर करण्यास

मुदतवाढ देण्यात आली असून **संगणक चाचणीचे विहित प्रमाणपत्र शासनास सादर करण्याचा अंतिम दिनांक २०.७.२००५ असा निश्चित करण्यात आला आहे.** शासन निर्णय, दिनांक २०.७.२००२ तसेच दि. २६ मे २००४ मधील इतर बाबी कायम राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(सोनाली मुळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधान परिषद/विधान सभा), मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
पोलीस महासंचालक, मुंबई,
सर्व पोलीस उप महासंचालक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद / महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, पहिला मजला, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत,
३, महानगरपालिका मार्ग, मुंबई-४०० ००१,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).

********